**राज्यातील रस्ते (रस्ते व पूल) यांची सुधारणा Hybrid Annuity तत्वावर करणेबाबत Equity व Mobilization Advance संदर्भातील सुधारणा.**

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक बांधकाम विभाग**
**शासन निर्णय क्र. संकीर्ण २०१८/प्र.क्र.४१३/रस्ते-५**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई -४०० ०३२.
दिनांक - ०९ जानेवारी, २०१९

वाचा :- १. शासन निर्णय, सा.बां.विभाग क्र. संकीर्ण २०१८/प्र.क्र.४९/शिकाना/नियोजन-१अ दि.०२.०८.२०१८
२. शासन पत्र, सा.बां.विभाग क्र. संकीर्ण २०१८/प्र.क्र.४९/शिकाना/नियोजन-१अ, दि.१०.०८.२०१८
३. शासन पत्र क्र. संकीर्ण २०१८/प्र.क्र.४१३/रस्ते-५, दि. २१.१२.२०१८

**प्रस्तावना** -

राज्याच्या रस्त्याच्या सर्वांगीण विकासासाठी राबविण्यात येणाऱ्या हायब्रीड ॲन्युईटी प्रकल्पाअंतर्गत ज्या उद्योजकांची स्वत:ची आर्थिक क्षमता आहे. त्यांना ४० टक्के Equity टप्प्याटप्प्याने Escrow Account मध्ये जमा करण्याबाबत परवानगी देण्यात आली आहे. तद्नुषंगाने उपरोक्त शा.नि. क्र.३ अन्वये परवानगी देण्यात आली असून, या संदर्भात उद्योजकांच्या प्राप्त झालेल्या सूचना आणि मुख्य अभियंता यांनी शासनासमोर मांडलेल्या अडचणी विचारात घेवून दि. ०१ नोव्हेंबर, २०१८ रोजी निर्गमित करण्यात आलेलया शासन निर्णयात हायब्रीड ॲन्युईटी योजनेमधील अडचणी सोडविण्यासाठी मा. मंत्री मंडळाच्या उपसमितीने दि. ०८ जानेवारी, २०१९ रोजी दिलेल्या मान्यतेनुसार खालील अंशत: बदल करण्यात येत आहेत :-

१) उपरोक्त शासन निर्णयात तक्ता क्र. १ मध्ये उद्योजकाने जमा करावयाची Equity ८ टक्के इतकी दर्शविण्यात आली आहे. यामध्ये मुख्य अभियंता यांनी केलेल्या शिफारशीनुसार ज्या उद्योजकांनी कामाच्या जागेवर प्रत्यक्ष काम सुरु केले आहे व त्यात स्वत:ची रक्कम खर्च केली आहे, अशा कामांच्या बाबतीत उद्योजकाने केलेल्या कामाची किंमत ही कार्यकारी अभियंता यांनी मोजमापे प्रमाणित करुन प्रचलित दरसूचीवर आधारीत निश्चित करण्यात यावी. या किंमतीला उद्योजकांची Equity म्हणून गृहीत धरण्यात यावे. अशा ठिकाणी उद्योजकाने Performance Bank Guarantee ५ टक्के, आणि Mobilization Advance ची Bank Guarantee १ टक्का इतकी जमा केल्यानंतर Escrow Account मध्ये उद्योजकाने ८ टक्के Equity जमा करण्याची अट शिथील करण्यात येत आहे. उद्योजकाने प्रत्यक्ष साईटवर काम सुरु केले असल्यास, त्यास Mobilization Advance चा प्रथम हप्ता (५ टक्के) Escrow Account मध्ये जमा करण्यास या शासन निर्णयाव्दारे परवानगी देण्यात येत आहे.

२) Equity ची रक्कम Escrow Account मध्ये जमा केलेली असल्यास उद्योजकाने सुरु केलेल्या कामाची किंमत १० टक्के (बीड प्रोजेक्ट कॉस्टच्या १० टक्के) इतके काम झाल्यानंतर त्यास Mobilization Advance चा व्दितीय हप्ता देण्यात यावा. तसेच Equity ची रक्कम Escrow Account मध्ये जमा करण्यास उद्योजकास सुट दिल्यानंतर उद्योजकाने सुरु केलेल्या कामाची

किंमत १० टक्के व ८ टक्के (Equity) असे एकूण किमान १८ टक्के इतके काम झाल्याशिवाय १st mile stone installment चे पेमेंट अदा करण्यात येवू नये. असे एकूण १८% काम पूर्ण झाल्यानंतरच त्यास Mobilization Advance चा व्दितीय हप्ता (५%) देण्यात यावा. उद्योजकाने ५ % Mobilization Advance घेतल्यानंतर Escrow Account मध्ये पुढील कामाचा खर्च Equity म्हणून जमा करणेस व Escrow Account मधूनच खर्च करणेस त्यास आदेशित करण्यात यावे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संकेतांक २०१९०१०९१५२८४७४३१८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Prashant Vinayakrao Patil

Digitally signed by Prashant Vinayakrao Patil
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Public Works Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=2b1bad66664b1e11e3bf66db1d526143e814db5f8c505422af66a5628314537e, cn=Prashant Vinayakrao Patil
Date: 2019.01.09 15:34:02 +05'30'

(प्रशांत पाटील)
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. मा. राज्यपाल, महाराष्ट्र राज्य यांचे सचिव
२. मा. मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांचे अप्पर मुख्य सचिव
३. मा. मंत्री (सा.बां.) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
४. मा. मंत्री (वित्त व नियोजन) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
५. मा.मंत्री (उर्जा, नवीन व नवीकरणीय ऊर्जा) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
६. मा.मंत्री (रोहयो व पर्यटन) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
७. मा.राज्यमंत्री (सा.बां.) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
८. मुख्य सचिव यांचे सह सचिव, मंत्रालय, मुंबई
९. अ.मु.स. (नियोजन) यांचे स्वीय सहायक, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई
१०. अ.मु.स. (वित्त) यांचे स्वीय सहायक, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
११. प्रधान सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई
१२. सचिव (रस्ते), सार्वजनिक बांधकाम विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई
१३. सर्व मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग
१४. उप सचिव (रस्ते) सार्वजनिक बांधकाम विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई
१५. सर्व अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ
१६. निवड नस्ती, रस्ते - ५/नियोजन-१अ, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई